नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी संचालनालयाच्या आस्थापनेवर जिल्हा नियोजन समिती, पालघरकरिता १५ अस्थायी पदे निर्माण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.१५०/का.१४२६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
तारीख: २६ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना :-**

महसूल व वन विभाग, क्र.प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.१७/०६/२०१४ च्या अधिसूचनेन्वये ठाणे जिल्ह्याचे विभाजन करून दि.०१/०८/२०१४ पासून पालघर, वसई, डहाणु, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा व विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करून नवनिर्मित पालघर जिल्हा निर्माण केला असून, त्याचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आले आहे.

ठाणे जिल्ह्याचे विभाजन होऊन `पालघर` हा नवीन जिल्हा अस्तित्वात येणार असल्यामुळे, ठाणे जिल्ह्यात कार्यरत असलेले जिल्हा नियोजन समिती कार्यालय हे ठाणे जिल्ह्याकरिता आवश्यक राहणार आहे. त्यामुळे, पालघर जिल्ह्यासाठी नवीन जिल्हा नियोजन समिती कार्यालय निर्माण करणे आवश्यक आहे.

दि.२५/०७/२०१४ रोजी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये याबाबत सविस्तर चर्चा करण्यात येऊन नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी जिल्हा नियोजन समिती कार्यालयाकरिता १५ पदांच्या निर्मितीस मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार नवीन पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२५/०७/२०१४ रोजीच्या बैठकीमध्ये दर्शविलेल्या मान्यतेनुसार नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या जिल्हा नियोजन समिती कार्यालयासाठी खाली नमूद केलेली १५ अस्थायी पदे नव्याने निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (ग्रेड पे) (रुपये) | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जिल्हा नियोजन अधिकारी (राजपत्रित गट-अ) | १५६००-३९१०० (५४००) | १ |
| २ | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (राजपत्रित गट-ब) | ९३००-३४८०० (४४००) | २ |
| ३ | लेखाधिकारी (राजपत्रित गट-ब) | ९३००-३४८०० (४४००) | १ |
| ४ | उपलेखापाल (अराजपत्रित गट-ब) | ९३००-३४८०० (४२००) | १ |
| ५ | संशोधन सहायक (अराजपत्रित गट-ब) | ९३००-३४८०० (४३००) | ४ |
| ६ | सांख्यिकी सहायक (गट-क) | ५२००-२०२०० (२८००) | २ |
| ७ | लिपिक (गट-क) | ५२००-२०२०० (१९००) | १ |

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (ग्रेड पे) (रुपये) | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| ८ | वाहनचालक (गट-क) * | ५२००-२०२०० (१९००) | १ |
| ९ | चपराशी (गट-ड) * | ४४००-७४४० (१३००) | २ |
| | एकूण :- | | **१५** |

* सदर पदे बाह्यस्त्रोताद्वारे (Outsourcing) व Multiskilling / Multitasking कर्मचा-यांच्या नियुक्तीने भरण्यात यावीत.

२. सदर पदांकरिता येणारा खर्च "मागणी क्र.ओ-७, ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा, ०२ जिल्हा नियोजन समिती, (०२) (०१) जिल्हा नियोजन समिती (योजनेतर) दत्तमत (३४५१ ०२१५)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३६३/२०१४/व्यय-८, दि.१५/०७/२०१४ व क्र.२६३/विसु-१, दि.२३/०७/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने आणि उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने २०१४०८२६१६३४३३६४१६निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६१६३४३३६४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2014.08.26 17:57:44 +05'30'

**वसंत कुळकर्णी**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
५) सर्व विभागीय आयुक्त.
६) सर्व जिल्हाधिकारी.
७) जिल्हाधिकारी, ठाणे.
८) जिल्हाधिकारी, पालघर.

९) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-२०.
१०) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
११) संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवी मुंबई/ पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पालघर.
१६) मा. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२.
१७) कक्ष अधिकारी (व्यय-८ / वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवडनस्ती (कार्यासन-१४२६), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई